**मुंबई शहर विकास योजनेंतर्गत सदनिका वाटप करण्याबाबत**
**परमार्थ सेवा समिती,परळ,मुंबई**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सदनिका-२०२३/प्र.क्र.४८६/सामासू**
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ जुलै, २०२४

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्र.मुंवियो-१०९०/३२६८० (४५९)/सुधार-१, दि.२३.०३.१९९४
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रिडा व विशेष सहाय्य विभाग क्र.मुंवियो-२०००/प्र.क्र.५७१/सुधार-१, दि.२८.११.२००१
३) शासन निर्णय, सामाजिक न्याय,सांस्कृतिक कार्य,क्रिडा व विशेष सहाय्य विभाग क्र.मुंवियो-२०००/प्र.क्र.५७१/सुधार-१, दि.१२.०७.२००४
४) आयुक्त, समाजकल्याण पुणे यांचे पत्र जा. क्र. सकआ/मावक/गृहनिर्माण/२०२२-२३/का-१२/२०९, दि.१०.०२.२०२३.
५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सदनिका २०२३/४८६/सामासु, दि. १५.०३.२०२४
६) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, मुंबई विभाग, मुंबई यांचे पत्र जा.क्र.मुं.वि/प्राउसक/मुंबई विकास / सदनिका २०२४-२५/१०९१/मुंबई, दि. २४.०४.२०२४

**प्रस्तावना :-**

मुंबई शहर विकास योजना, १९८९-९० अंतर्गत या विभागाला प्राप्त झालेल्या सदनिका महिला कल्याण, बाल कल्याण, अपंग कल्याण, मतिमंदाचे कल्याण, व्यसनमुक्ती कार्यक्रम तसेच अनुसूचित जाती, विमुक्त भटक्या जमाती यांच्यासाठी विशेष कार्यक्रम राबविणाऱ्या व ज्येष्ठ नागरिकाचे उपक्रम राबविणा-या स्वयंसेवी संस्थांना / महामंडळांना भाडेपट्टी तत्वावर उपरोक्त संदर्भ क्र (१) (२) व (३) या शासन निर्णयान्वये ठरविलेल्या नियम व अटींच्या अधिन राहून पात्र स्वयंसेवी संस्थांना देण्यात येतात.या योजनेतर्गत स्वयंसेवी संस्थांना वाटप करण्यात आलेल्या पात्र संस्थांना सदनिका रिक्त करुन व डागडुजी करुन वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुंबई शहर विकास योजना, १९८९-९० अंतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाला प्राप्त झालेल्या सदनिका उपरोक्त प्रयोजनार्थ स्वयंसेवी संस्थांना भाडे तत्वावर देण्यात येतात. या योजनेतर्गत रिक्त असलेल्या सदनिका वाटपासंदर्भात स्वयंसेवी संस्थेकडून प्राप्त झालेल्या अर्जानुसार परमार्थ सेवा समिती,परळ,मुंबई या संस्थेला अशोकवन सोसायटी बोरिवली पुर्व येथील ०२ सदनिका वाटप करण्यास सदर्भाधीन दि. १५ मार्च,२०२४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

२. परमार्थ सेवा समिती, परळ, मुंबई ही संस्था सन २००८ मध्ये नोंदणीकृत झालेली आहे. परमार्थ सेवा वैद्यकीय क्षेत्र, शैक्षणिक क्षेत्र, सामाजिक क्षेत्रात कार्यरत आहे. परमार्थ सेवा समिती या संस्थेस उक्त मंजूर २

सदनिकांव्यतिरिक्त अतिरिक्त सदनिकांची आवश्यकता असल्याची सदर संस्थेने मागणी केली आहे. परमार्थ सेवा समिती या संस्थेचे वैद्यकीय व सामाजिक क्षेत्रातील भरीव योगदान पाहता, विभागाच्या संदर्भाधीन दि. २३/०३/१९९४, दि. २८/११/२००१ व दि. १२/०७/२००४ च्या शासन निर्णयामधील नमूद अटी व शर्ती तसेच निकषांची पूर्तता करत असल्याची शहानिशा करुन मुंबई विकास योजना १९८९-९० अंतर्गत सदर संस्थेस मुंबई शहर विकास योजनेंतर्गत अनुज्ञेय योजना राबविण्यासाठी बी-२२ कल्याण केंद्र, अशोकवन, बोरीवली (पूर्व) येथे लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळाला वाटप करण्यात आलेल्या खालील १६ सदनिका सदर सदनिकातील महामंडळाचे साहित्य व अभिलेख अन्य योग्य ठिकाणी सुरक्षितरित्या हस्तांतरीत करुन डागडुजी करण्याच्या अधीन ०२ (दोन) वर्षाच्या कालावधीकरिता वाटप करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | सदनिकेचे ठिकाण | सदनिका क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | परमार्थ सेवा समिती,परळ,मुंबई | बी-२२ कल्याण केंद्र, अशोकवन, बोरीवली (पूर्व) | १०१,१०२,१०३,१०४ (पहिला मजला) |
| | | | २०१,२०२,२०३,२०४ (दुसरा मजला) |
| | | | ३०१,३०२,३०३,३०४ ( तिसरा मजला) |
| | | | ४०१,४०२,४०३,४०४ (चौथा मजला) |

३. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, मुंबई यांनी शासन निर्णय दि. २८/११/२००१ च्या तरतूदीनुसार आवश्यक तो करारनामा करुन सदनिका वाटपासंदर्भात कार्यवाही करावी. तसेच संस्थेकडून आवश्यक त्या कागदपत्रांची तसेच अटी व शर्तींची पूर्तता झाल्यानंतर संस्थेला दिलेल्या सदनिकेचा ताबा दिल्याबाबतचा अहवाल आयुक्तालयामार्फत शासनास सादर करावा तसेच संदर्भाधीन शासन निर्णयातील तरतूदींचे प्रादेशिक उपायुक्त. समाजकल्याण, मुंबई यांनी काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर सदनिकांची वीज देयक व देखभाल खर्च हा संस्थेने स्वत:च्या स्तरावर करावा. तसेच स्वयंसेवी संस्थेने सदनिकेचा वापर संदर्भाधीन शासन निर्णयात नमूद योग्य कामासाठी केला जात असल्याबाबतची खात्री वेळोवेळी प्रादेशिक उपायुक्त. समाजकल्याण, मुंबई यांनी करावी.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२४०७१६१६२३४१०९२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2024.07.16 16:34:59 +05'30'

**( राजेश मांजरेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,** १. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
२. आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
३. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई
४.सहायक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई उपनगर
५.अध्यक्ष/सचिव,परमार्थ सेवा समिती,परळ,मुंबई
६.निवडनस्ती (सामासू)